**केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करिता Single Nodal Agency व Nodal Officer यांची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ०७ ऑक्टोबर, २०२१

वाचा:-१) भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापन F.No.१(१३) /PFMS/FCD /२०२०, दि.२३.०३.२०२१.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा-प्रशा-४,दि.१ जुलै २०२१.
३) शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१, दि.१५ जुलै २०२१.
४) शासन निर्णय क्रमांक:-बीजीएम १०.२१/(११०/२१)/अर्थ-१, दि.५ ऑगस्ट २०२१

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे, तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ मार्च २०१९ रोजीच्या ज्ञापनान्वये सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरून वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियम व्यवस्थापन (PFMS) बाबत सुधारित सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी Single Nodal Agency(SNA) ची नेमणूक करून त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Bank Account उघडणे आवश्यक आहे. तसेच, सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुसार जलसंपदा विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांकरिता Single Nodal Agency(SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियम व्यवस्थापन (PFMS) करिता Single Nodal Agency व Nodal Officer यांच्या नियुक्तीबाबतचे संदर्भाधिन दिनांक १५ जुलै, २०२१ आणि दिनांक ०५ ऑगस्ट, २०२१ चे शासन निर्णय, या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहेत.**

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार, जलसंपदा विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी पुढील तक्त्यामधील रकाना क्र.२ मधील योजनांकरिता रकाना क्र.५ नुसार Single Nodal Agency(SNA) नियुक्त करण्याचा तसेच, केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयासाठी रकाना क्र.६ नुसार Nodal Officer नियुक्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अ. क्र | केंद्र पुरस्कृत योजना | केंद्र योजना संकेतांक/ क्रमांक | समविष्ट प्रकल्प (मोठे/मध्यम /लघु) | Single Nodal Agency | Nodal Officer |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | प्रधानमंत्री कृषि सिंचाई योजना (PMKSY)(Accelerated Irrigation Benifit Programme)(Servicing of Loans from NABARD Under PMKSY) | ३६३६ | २६ | आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव | १) उपसचिव (निवसं) |
| २ | प्रधानमंत्री कृषि सिंचाई योजना(लाभक्षेत्र विकास प्राधिकरण)(Command Area Development Authority)(Har Khet Ko | २०५२ | २२ | | २) उपसचिव (लाक्षेवि) |
| ३ | बळीराजा जलसंजीवनी योजना (Baliraja Jalsanjivani Yojana)(Special Package for completion Of Irrigation Projects to address agrarian distress in districts of Vidarbh and Marathwada and other Chronically drought prone areas of rest of maharashtra) | ३६२० | ९१ | | ३) उपसचिव (निवसं) |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००८१०४९४४९९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SATISH KARBHARI JONDHALE
Date: 2021.10.08 10:50:39 +05'30'

**( सतीश जोंधळे )**

**आंतर वित्तीय सल्लागार व सहसचिव**

**प्रत:-**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
६) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
७) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
८) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

९) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१०) उपसचिव, (निवसं/लाक्षेवी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) Asst.State Nodal Officer, State Directorate, PFMS, Maharashtra.
१२) वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-१०/अर्थोपाय/साउ/अर्थबळ), मंत्रालय, मुंबई
१३) नियोजन विभाग (कार्यासन १४३३) मंत्रालय, मुंबई,
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) अर्थ-१/२ कार्यासन संग्रहार्थ.